**सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे, या योजनेंतर्गत Deep Search Metal Detector (DSMD) उपकरणांच्या खरेदी खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः जेएलएम ०५२४/प्र.क्र.८३/तुरुंग-२

दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ९ जुलै, २०२४.

संदर्भ-

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इप्रवि/मेंन्टेनंन्स/सुरक्षा उपकरणे/४४३३/२०२४/क-६(०१)पुणे,दिनांक २८.५.२०२४.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग -२, दिनांक १७.४.२०१५,
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६,
४. उद्योग, उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.८.२०१७

प्रस्तावना-

राज्यातील कारागृहांमध्ये बंद्यांची झडती घेण्यासाठी Deep Search Metal Detector (DSMD) ही सुरक्षा उपकरणे खरेदी करण्याचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेकरिता संदर्भ क्र.१ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे, या योजनेतंर्गत रु.२,२०,५०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी वीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेची Deep Search Metal Detector (DSMD) या सुरक्षा उपकरणांच्या खरेदी खर्चास सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खरेदी उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्र. भांखस-२०१/प्र.क्र.८२/भाग III/उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६ व शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.८.२०१७ मध्ये नमूद तरतुदींच्या अनुषंगाने विहित पद्धतीचा अवलंब करुन केली जाईल याची काटेकोरपणाने खात्री करावी.

३. यावरील होणारा खर्च मागणी क्र बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००) (१०१) तुरुंग (००) (१८) तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे (योजनांतर्गत योजना) (२०५६ ०२२२) ५२- यंत्र सामग्री व साधन सामग्री, या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व सदर अनुदान खर्चाबाबतचे मासिक विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०९१६१८३२४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2024.07.09 16:29:45 +05'30'

**( विनायक चव्हाण )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. कारागृह उपमहानिरीक्षक,पूर्व विभाग/पश्चिम विभाग/मध्य विभाग/दक्षिण विभाग/नाशिक विभाग,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.